भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कनिष्ठ भूवैज्ञानिक यांची रोखून धरलेली वेतनवाढ परिविक्षाधीन कालावधी समाप्तीनंतर व त्यापुढील वेतनवाढी मुक्त करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना-२०१४/प्र.क्र.२००/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई-४०० ००१.

तारीख: २६ एप्रिल, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः आपना-४५०३/प्र.क्र.१०१/ पापु-१५ दिनांक २७.०९.२००५.

२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः आपना-४५११/प्र.क्र.३६८/पापु-१५ दिनांक १६.०३.२०१२.

३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः आपना-२३०९/प्र.क्र.३१४/पापु-१५ दिनांक ०४.०५.२०१२.

४) श्री. ब्राम्हणकर विरूध्द महाराष्ट्र शासन मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथील मूळ अर्ज क्र. ५७१/२०१३ व क्र.५७१/२०१३ व M.A.No.४२४/२०१४ मध्ये मा. न्यायाधिकरणाने दिनांक २५.०९.२०१४ रोजी दिलेला न्यायनिर्णय.

५) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची पूरक अधिसूचना क्रमांक पी-१ (२)(४०)/(विशेष बाब)/१ दिनांक १०.१०.२०१४.

६) शासन आदेश क्रमांकः आपना-२०१४/प्र.क्र.२००/पापु-१५ दिनांक २५.०३.२०१५.

प्रस्तावना-

संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २७.०९.२००५ रोजीच्या आदेशान्वये श्री. राहुल ब्राम्हणकर यांची भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कनिष्ठ भूवैज्ञानिक गट-ब या पदावर नामनिर्देशनाने दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी नेमणूक करण्यात आली होती. कनिष्ठ भूवैज्ञानिक पदाच्या सेवा प्रवेश नियमानुसार व नियुक्तीच्या शासन आदेशातील अटी-शर्तीनुसार नामनिर्देशानाने नियुक्त झालेल्या कनिष्ठ भूवैज्ञानिकांनी विहित मुदतीत विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. त्यानुसार विभागीय परिक्षा उत्तीर्ण नसल्याने श्री. राहुल ब्राम्हणकर यांच्या सेवा दिनांक ०४.०५.२०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये समाप्त केल्या होत्या. मात्र तत्पूर्वी संदर्भाधिन दिनांक १६.०३.२०१२ रोजीच्या आदेशानुसार नामनिर्देशनाने सहाय्यक भूवैज्ञानिक पदावर दिनांक ३१.०३.२०१२ रोजी श्री. ब्राम्हणकर रूजू झाले. यामुळे प्रत्यक्षात सेवा समाप्तीच्या आदेशाची अंमलबजावणी झालेली नाही. तथापि त्यांना महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र.५७१/२०१३ व M.A.No.४२४/२०१४ अर्ज क्रमांक ५२४/२०१४ मध्ये मा. न्यायाधिकरणाने दिनांक २५.०९.२०१४ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक १०.१०.२०१४

रोजीच्या पूरक अधिसूचनेनुसार त्यांना विभागीय परिक्षेत उत्तीर्ण घोषित केले. त्याअनुषंगाने दिनांक २५.०३.२०१५ रोजीच्या आदेशान्वये त्यांचा परिविक्षाधीन कालावधी निकाल घोषित केल्याच्या दिनांकापासून दिनांक १०.१०.२०१४ पासून समाप्त करण्यात आला. मात्र त्यांची दुसरी वेतनवाढ कधीपासून देय राहील याबाबत स्वतंत्ररित्या शासन आदेश निर्गमित करण्यात येईल असे नमूद केलेले होते. श्री. राहुल ब्राम्हणकर यांची दुसरी व त्यापुढील वेतनवाढी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

**०२.** शासन अधिसूचना वित्त विभाग दिनांक २२/०४/२००९ मधील नियम क्रमांक १० नुसार श्री. राहुल ब्राम्हणकर सहाय्यक भूवैज्ञानिक (तत्कालीन कनिष्ठ भूवैज्ञानिक) यांच्या दिनांक ०१.०७.२००७ पासून प्रलंबित असलेल्या दुसऱ्या व त्यापुढील वेतनवाढी नियमितपणे क्रमाक्रमाने मुक्त करण्यात याव्यात.

**०३.** दिनांक ०१.०७.२००७ पासूनच्या वेतनवाढी मुक्त करण्याबाबत, त्याअनुषंगाने वेतन निश्चिती, सहाय्यक भूवैज्ञानिक पदावरील सरळसेवेने नियुक्तीनंतर वेतन निश्चिती व त्याअनुषंगाने उचित आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा- संचालनालयाने निर्गमित करावेत.

**०४.** सद्यस्थितीत श्री. राहुल ब्राम्हणकर सहाय्यक भूवैज्ञानिक (तत्कालीन कनिष्ठ भूवैज्ञानिक) प्रतिनियुक्तीने राज्य पाणी व स्वच्छता मिशन येथे भूजल तज्ञ पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत असल्याने उक्त वेतनवाढी मुक्त केल्यानुसार व वेतन निश्चिती केल्यानुसार थकबाकीची अदायगी राज्य पाणी व स्वच्छता मिशन द्वारे करण्यात यावी.

**०५.** वेतनवाढी मुक्त केल्याबाबत, वेतन निश्चिती केल्याबाबत व त्याअनुषंगाने थकबाकी अदायगी केल्याबाबतच्या उचित नोंदी सेवापुस्तकात घेण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२६१५११२८९४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2023.04.26 15:31:15 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे

२. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
३. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
६. उपसंचालक (सर्व), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
७. वरिष्ठ भूवैज्ञानिक (सर्व), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
८. कनिष्ठ भूवैज्ञानिक (सर्व संबंधित), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
९. अभियान संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, पहिला मजला, सिडको भवन (दक्षिण कक्ष), बेलापूर, नवी मुंबई.
१०. श्री. राहुल ब्राम्हणकर, सहाय्यक भूवैज्ञानिक यांना राज्य पाणी व स्वच्छता मिशन मार्फत.
११. निवडनस्ती (कार्यासन पापु-१५).